**प्रकल्पग्रस्तांचे सांख्यिकी माहितीचे संगणकीकरण-**
**प्रकल्प अंमलबजावणी समितीचे पुनर्गठन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - संकिर्ण -२०१५ /प्र.क्र. १४५ /र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ८ जुलै , २०१५

**वाचा :**

१)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक सीओएम -१००१ /प्र.क.१७४ /०१/, दिनांक २९.१०.२००१.
२) महसूल व वन विभाग ,शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०११/प्र.क्र.८०/भाग-१/र-१, दिनांक १८.०६.२०११.
३) महसूल व वन विभाग ,शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०११/प्र.क्र.८०/भाग-१/र-१, दिनांक ०४.०१.२०१२.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील प्रकल्पग्रस्तांचे "महाराष्ट्र प्रकल्पबाधीत व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९७६,१९८६ व १९९९" मधील तरतुदीनुसार पुनर्वसन करण्यासाठी व पुनर्वसनाच्या नियोजनासाठी सांख्यिकी माहिती संकलीत करण्यासाठी सॉफ्टवेअर (Software) विकसित करण्यासाठी शासन निर्णय क्रमांक संकिर्ण - २०११/प्र.क्र.८०/भाग-१/र-१, दिनांक १८.०६.२०११ नुसार "प्रकल्प अंमलबजावणी समिती" गठीत करण्यात आली आहे. बहुतांशी प्रकल्प हे जलसंपदा विभागाचे असल्याने शासन निर्णय क्रमांक महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०११/प्र.क्र.८०/भाग-१/र-१, दिनांक ०४.०१.२०१२ नुसार सदरच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीमध्ये प्रधान सचिव (जलसंपदा) यांचा सदस्य म्हणून समावेश करण्यात आला आहे. त्यानुसार प्रकल्पग्रस्तांच्या सांख्यिकी माहितीचे संगणकीकरण करण्याचे काम महाराष्ट्र राज्यातील ठाणे, सोलापूर, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या सहा जिल्हयात पथदर्शक प्रकल्प म्हणून राबविण्यात आले आहे. सदर प्रकल्प उर्वरित सर्व जिल्हयामध्ये राबविणे आवश्यक असल्याने तसेच केंद्र शासनाचा नवीन भूसंपादन कायदा २०१३ मधील तरतुदी व भूसंपादनाचे मॉडेल सदर प्रणालीमध्ये समाविष्ट करणे आवश्यक असल्याने दिनांक १८.०६.२०११ च्या शासन निर्णयानुसार गठीत केलेल्या **प्रकल्प अंमलबजावणी** समितीचे पुनर्गठन करण्याची बाब शासनाच्या विधाराधीन होती.

**शासन निर्णय –**

प्रकल्पग्रस्ताच्या सांख्यिकी माहितीच्या संगणकीकरण करण्याबाबतचा प्रकल्प सर्व जिल्हयामध्ये राबविण्याकरीता, केंद्र शासनाचा नवीन भूसंपादन कायदा २०१३ मधील तरतुदी व भूसंपादनाचे मॉडेल सदर प्रणालीमध्ये समाविष्ट करण्याकरीता या विभागाच्या दिनांक १८.०६.२०११ च्या शासन निर्णयानुसार गठीत केलेल्या **प्रकल्प अंमलबजावणी** समितीचे खालील प्रमाणे **पुनर्गठन** करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | अप्पर मुख्य सचिव, (वित्त) मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव, (माहिती व तंत्रज्ञान) मंत्रालय, मुंबई. | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४ | प्रधान सचिव, (नियोजन) मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव, (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ६ | सचिव, (मदत व पुनर्वसन ) मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ७ | सचिव, (वने) मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ८ | उप सचिव, (भूसंपादन) मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ९ | उप सचिव, (पुनर्वसन) मंत्रालय, मुंबई. | समिती सचिव |
| १० | तज्ञ म्हणून ऑल इंडिया इन्स्टीटयूट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेट, मुंबई. | निमंत्रक |

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१३१५४५०७६५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shobha Vijaykumar Patki

Digitally signed by Shobha Vijaykumar Patki
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shobha Vijaykumar Patki
Date: 2015.07.13 15:46:40 +05'30'

**(शोभा वि.पत्की )**

अवर सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, (वित्त) मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, (माहिती व तंत्रज्ञान) मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, (नियोजन) मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, (मदत व पुनर्वसन ) मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, (वने) मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव, (भूसंपादन) मंत्रालय, मुंबई.
९. उप सचिव, (पुनर्वसन) मंत्रालय, मुंबई.
१०.सर्व विभागीय आयुक्त.
११.सर्व जिल्हाधिकारी.
१२.सर्व उपायुक्त (पुनर्वसन),
१३.सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी.
१४. ऑल इंडिया इन्स्टीटयूट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेट, मुंबई.
१५.सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.सर्व कार्यासने (मदत व पुनर्वसन ) मंत्रालय, मुंबई.
१७.निवड नस्ती, र-१ कार्यासन.